पुणे जिल्ह्यातील आंबेगाव तालुक्यातील इतर जिल्हा मार्ग, प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नती करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक बांधकाम विभाग
शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०२४/प्र.क्र.२६/नियोजन-२
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- २६ जून, २०२४

**पहावे** :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचे पत्र जा.क्र.का-२/रेशा/८७/११५९/सन २०२४, दि.०२/०२/२०२४.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांनी संदर्भाधिन पत्रान्वये पुणे जिल्ह्यातील आंबेगाव तालुक्यातील इतर जिल्हा मार्ग, प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नती करणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. तसेच जिल्हा परिषद, पुणे यांनी सदर रस्ते दर्जोन्नत करणेबाबत मागणी केलेली आहे.

सदर रस्त्यांवरील गावांची संख्या, लोकसंख्या, रस्त्यांचा होणारा वापर तसेच जिल्हा परिषद, पुणे यांचा ठराव विचारात घेता, सदर रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचा प्रस्ताव व जिल्हा परिषद, पुणे यांचा ठराव विचारात घेऊन पुणे जिल्ह्यातील आंबेगाव तालुक्यातील खालील इतर जिल्हा मार्ग प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नांव | सामाविष्ठ रस्त्याचा क्रमांक | साखळी क्रमांक व लांबी | दर्जोन्नत करावयाची एकूण लांबी (कि.मी.) | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|
| १. | रामा-११२ ते तळेघर-फलोदे-म्हाळुंगे-कुशिरे बु., कुशिरे खु., कोंढरे ते प्रजिमा-१६५ पर्यंतचा रस्ता. | इतर जिल्हा मार्ग-२० (भाग-म्हाळुंगे ते तळेघर) | (१०/०० ते १९/००) ९.०० कि.मी. | १८.५०० कि.मी. | **प्रमुख जिल्हा मार्ग-२३९** |
| | | इतर जिल्हा मार्ग -३६ (भाग-प्रजिमा १६५ ते म्हाळुंगे) | (०/०० ते ९/५००) ९.५०० कि.मी. | | |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २. | प्रजिमा-१२ वरची सुपेवाडी, फदालेवाडी, उगलेवाडी शिनोली, कानसे, गंगापूर बु., गंगापूर खु., ठाकरवाडी पर्यंतचा रस्ता. | इतर जिल्हा मार्ग-२७ (भाग लांबी -वरची सुपेवाडी ते शिनोली रामा ११२) | (०/०० ते ७/२००) ७.२०० कि.मी. | १६.२०० कि.मी. | **प्रमुख जिल्हा मार्ग-२४०** |
| | | इतर जिल्हा मार्ग-३५ (भाग लांबी-शिनोली ते कानसे) | (५/०० ते ६/००) १.०० कि.मी. | | |
| | | इतर जिल्हा मार्ग-२२ (भाग लांबी-कानसे ते ठाकरवाडी) | (२/०० ते १०/००) ८.०० कि.मी. | | |
| ३. | डिंभे बोरघर आहुपे बालवीरवाडी कोंढवळ ते रामा ११२-रस्ता. | १९.०० कि.मी. अस्तित्वातील प्रमुख जिल्हा मार्ग क्र. १६५ मध्ये १९.०० कि.मी. लांबी समाविष्ट करणे. | (०/०० ते १९/००) १९.०० कि.मी. | १९.०० कि.मी. | अस्तित्वातील प्रमुख जिल्हा मार्ग क्र १६५ .मध्ये उपरोक्त १९.०० कि.मी. लांबी समाविष्ट केल्यास, प्रजिमा क्र. १६५ ची एकूण लांबी = प्रजिमा क्र. १६५ ची मुळ लांबी ५१.०० कि.मी.+समाविष्ट लांबी १९.०० कि. मी. = ७०.०० कि.मी. इतकी होईल. |
| | **एकूण** | | | **५३.७०० कि.मी.** | |

परिणामी रस्ते विकास योजना २००१-२०२१ मधील, पुणे जिल्ह्यातील प्रमुख जिल्हा मार्ग दर्जाच्या रस्त्यांच्या एकूण लांबीत **५३.७०० कि.मी.** ने वाढ होवून एकूण लांबी (५४०१.२८० + ५३.७००) म्हणजेच **५४५४.९८० कि.मी.** इतकी व इतर जिल्हा मार्ग रस्त्यांच्या एकूण लांबीत ५३.७०० कि.मी. ने घट होवून एकूण लांबी ( १६०८.५८०-५३.७००) म्हणजेच **१५५४.८८० कि.मी.** इतकी होईल.

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२४०६२७१२०५५२५०१८ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GANPAT SANDIPAN KACHARE

Digitally signed by GANPAT SANDIPAN KACHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=3021bf955fefd71ffad5dd7c97769147f19aca6383a12fed6cff4849d78e224a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B5B30AEBA818C77E43E7B8BA4BCA0E9F0D137FEAB0BBCB16CACF2D44087EBA76, cn=GANPAT SANDIPAN KACHARE
Date: 2024.06.27 12:17:27 +05'30'

**( ग. सं. कचरे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, पुणे.

२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

३) अधीक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, पुणे. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)

**प्रत :-**

१) उप सचिव, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई

२) जिल्हाधिकारी, पुणे.

३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे.

४) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (उत्तर) विभाग, पुणे.

५) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.

६) रेखाचित्र शाखा, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय.

७) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.

८) निवडनस्ती.